सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत राज्य कामगार विमा योजनेतंर्गत कार्यरत असणा-या वैद्यकीय अधिका-यांना ६ व्या वेतन आयोगातील वेतनश्रेणीनुसार ३५ टक्के दराने व्यवसाय रोध भत्ता मंजूर करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राकावि-१६१३/प्र.क्र.२५९/सेवा-१**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल , ८ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
दिनांक :- १० ऑगस्ट, २०१५

वाचा :-

१) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.राकायो-१९००/प्र.क्र.२०७/२०००/ राकावि-१, दि.१०.०६.२००२.**
२) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. मवैअ-२०११/प्र.क्र.६२६/११/सेवा-३, दि. ०७.०८.२०१२.**

प्रस्तावना :-

वाचा येथील दिनांक १०.०६.२००२ च्या शासन निर्णयान्वये, राज्यातील राज्य कामगार विमा योजनेतील महाराष्ट्र वैद्यकीय विमा सेवा संवर्गातील ज्या पदांना व्यवसायरोध भत्ता लागू आहे, अशा पदांवर कार्यरत असलेल्या अधिकाऱ्यांना मूळ वेतनाच्या २५ टक्के इतका व्यवसायरोध भत्ता दिनांक ०१.०७.२००० पासून मंजूर करण्यात आला आहे. ज्यावरील नेमणूकीसाठी इंडियन मेडिकल कौन्सिल ॲक्ट, १९५६ किंवा डेंटिस्ट ॲक्ट, १९४८ मध्ये विहित केलेली आवश्यक शैक्षणीक अर्हता आवश्यक आहे आणि ज्या पदांना व्यवसायरोध भत्ता अनुज्ञेय ठरविण्यात आला आहे तसेच राज्य कामागर विमा योजनेखालील आयुर्वेद पदवीधारक वैद्यकीय अधिकारी ज्यांना व्यवसायरोध भत्ता अनुज्ञेय आहे अशा सर्व वैद्यकीय पदांना व्यवसायरोध भत्ता अनुज्ञेय करण्यात आला होता. त्याचप्रमाणे वाचा येथील दिनांक ०७.०८.२०१२ च्या शासन निर्णयान्वये आरोग्य सेवा संचालनालयातील जिल्हा शल्य चिकित्सक, वैद्यकीय अधिक्षक, वैद्यकीय अधिकारी विशेषज्ञ आणि वैद्यकीय अधिकारी गट-अ (राज्यस्तर) यांना ६व्या वेतन आयोगातील वेतनश्रेणीनुसार मूळ वेतनाच्या ३५ टक्के व्यवसायरोध भत्ता मंजूर करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. याच धर्तीवर राज्य कामगार विमा योजनेतील महाराष्ट्र वैद्यकीय विमा सेवा संवर्गातील ज्या पदांना व्यवसायरोध भत्ता लागू आहे अशा पदांवर कार्यरत असलेल्या अधिकाऱ्यांना ३५ टक्के व्यवसायरोध भत्ता लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यास अनुसरून शासन आता खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय:-

राज्य शासनाच्या सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत राज्य कामगार विमा योजनेअंतर्गत महाराष्ट्र वैद्यकीय विमा सेवा संवर्गातील, ज्यावरील नेमणूकीसाठी इंडियन मेडिकल कौन्सिल ॲक्ट, १९५६ किंवा डेंटिस्ट ॲक्ट, १९४८ मध्ये विहित केलेली आवश्यक शैक्षणीक अर्हता आवश्यक आहे आणि ज्या पदांना व्यवसायरोध भत्ता अनुज्ञेय ठरविण्यात आला आहे तसेच राज्य कामगार विमा योजनेखालील आयुर्वेद पदवीधारक वैद्यकीय अधिकारी ज्यांना व्यवसायरोध भत्ता अनुज्ञेय आहे, अशा सर्व वैद्यकीय अधिका-यांना ६ व्या वेतन आयोगातील वेतन श्रेणीनुसार मुळ वेतनाच्या ३५% व्यवसाय रोध भत्ता दि. ०१.०७.२०१२ पासून अनुज्ञेय करण्यास मान्यता देण्यात येत आहे. परंतू त्यांना मिळणारे मूळ वेतन (मूळ वेतन म्हणजे संबंधित पदाचे विहित वेतन बँड मध्ये आहरीत करीत असलेले वेतन + अनुज्ञेय ग्रेड पे असे एकूण वेतन) अधिक व्यवसायरोध भत्ता यांची एकत्रित रक्कम दरमहा रू. ८५,०००/- पेक्षा जास्त नसावी.

२. सदर व्यवसाय रोध भत्ता दि.०१.०४.२०१५ पासून रोखीने देण्यात यावा. दि. ०१.०७.२०१२ ते दि.३१.०३.२०१५ या कालावधीतील व्यवसायरोध भत्त्याची थकबाकी रोखीने देण्यात येईल. मात्र याबाबतची आवश्यक ती खर्चाची तरतूद विधानमंडळाच्या नजरेस आणण्याबाबत आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, डिसेंबर २०१५ च्या अधिवेशनात खर्चाची नवीन बाब म्हणून पूरक मागणीचा प्रस्ताव शासनास सादर करतील. सदर पूरक मागणीस विधानमंडळाने मान्यता दिल्यानंतरच सदर थकबाकी रोखीने अदा करण्यात येईल.

३. महाराष्ट्र राज्याच्या सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत राज्य कामगार विमा योजनेतील महाराष्ट्र वैद्यकीय विमा सेवेत ज्यांची नियुक्ती विमा रुग्ण सेवेशी संबंधित वैद्यकीय अधिकारी पदावर झालेली आहे, अशा सर्व विमा रुग्ण सेवेशी संबंधित व विमा रुग्ण सेवेशी संबंधित नसलेल्या पर्यवेक्षकीय, कार्यकारी व विमा रूग्णसेवेशी संलग्न असणा-या पदांवर कार्यरत असणा-या केवळ सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत राज्य कामगार विमा योजनेतील महाराष्ट्र वैद्यकीय विमा सेवा संवर्गात कार्यरत असणा-या वैद्यकीय अधिका-यांनाच सदर शासन निर्णयातील तरतूदी लागू राहतील. तसेच राज्य कामगार विमा योजनेच्या नियत्रंणाखाली असलेल्या आयुर्वेदिक पदवीधारक वैद्यकीय अधिकारीही या भत्त्यासाठी पात्र असतील.

४. सध्या ज्या पदांना व्यवसाय रोध भत्ता अनुज्ञेय करण्यात आलेला आहे, त्या वैद्यकीय अधिका-यांना कोणत्याही प्रकारचे खाजगी, स्वतंत्र व्यवसाय करता येणार नाही व तसे आढळल्यास ते नियमानुसार कार्यवाहीस पात्र राहतील. तथापि, सदर तरतूदीची अंमलबजावणी व सनियंत्रण करण्याची खालील कार्यपध्दती/यंत्रणा विहीत करण्यात येत आहे.

४.१) व्यवसाय रोध भत्ता लागू केला असल्यामुळे कोणत्याही वैद्यकीय अधिका-याला याबाबत व्यवसाय रोध भत्ता न घेण्याबाबतचा विकल्प देता येणार नाही.

४.२) व्यवसाय रोध भत्ता अनुज्ञेय असलेल्या वैद्यकीय अधिका-यांनी त्यांच्या नियुक्तीच्या ठिकाणी वास्तव्य करणे

आवश्यक राहील.

४.३) व्यवसाय रोध भत्ता अनुज्ञेय असलेल्या वैद्यकीय अधिका-यांना स्वत:च्या नांवे रुग्णालय, दवाखाना चालविता येणार नाही किंवा नोंदणी करता येणार नाही.

४.४) व्यवसाय रोध भत्ता अनुज्ञेय असलेल्या वैद्यकीय अधिका-यांना अन्य खाजगी रुग्णालयात किंवा दवाखान्यात जाऊन आरोग्य सेवा देता येणार नाही. राज्य कामगार विमा योजनेतील सर्व वैद्यकीय अधिकारी यांना व्यवसाय रोध भत्ता अनुज्ञेय केला असल्याने खाजगी व्यवसायास पूर्णत: बंदी राहील. याबाबत शासनाकडून आकस्मिक भेटीव्दारे ही यासंबंधी चौकशी केली जाईल व त्यावेळी वैद्यकीय अधिकारी खाजगी व्यवसाय करीत असल्याचे आढळून आल्यास संबंधित वैद्यकीय अधिकारी जबर शिक्षेस पात्र राहील.

४.५) व्यवसाय रोध भत्ता अनुज्ञेय असलेल्या वैद्यकीय अधिका-यांची कोणत्याही रुग्णालयात / दवाखान्यात कोणत्याही प्रकारची प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष भागीदारी असता कामा नये.

४.६) व्यवसाय रोध भत्ता अनुज्ञेय असलेला वैद्यकीय अधिकारी जेथे काम करीत असेल तेथील नियंत्रण अधिका-याने त्यांच्या अखत्यारीतील वैद्यकीय अधिकारी खाजगी व्यवसाय करीत नाहीत व मुख्यालयाच्या ठिकाणी राहतात हे दरमहा प्रमाणित करणे बंधनकारक राहील. त्याचप्रमाणे या शासन निर्णयान्वये व्यवसायरोध भत्ता अनुज्ञेय करण्यात आलेले वैद्यकीय अधिकारी खाजगी व्यवसाय करत नसलेबाबतचा अहवाल / प्रमाणपत्र सर्व वैद्यकिय अधिक्षक तसेच सर्व वैद्यकीय प्रशासन अधिकारी यांनी आयुक्त, राज्य कामगार विमा योजना यांना दरवर्षी जानेवारी व जून अखेरीस सादर करावा. आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई हे एकत्रित अहवाल दरवर्षी जानेवारी व जून अखेरीस शासनास सादर करतील.

४.७) व्यवसाय रोध भत्ता अनुज्ञेय असलेल्या ज्या वैद्यकीय अधिका-यांबाबत प्रतिकूल अहवाल प्राप्त होईल, त्यांच्याविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ व महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ मधील तरतूदीनुसार तात्काळ शिस्तभंगविषयक विहीत कारवाई सुरू करण्याची जबाबदारी आयुक्त, राज्य कामगार विमा योजना यांची राहील तसेच विभागीय चौकशी अंती अपराध / दोष सिध्द झाल्यानंतर ज्या दोषी वैद्यकीय अधिका-यांवर शिक्षेचे आदेश बजावले जातील त्या अपराध / दोषारोप सिध्द झालेल्या वैद्यकीय अधिका-यांना शिक्षा कालावधी दरम्यान व्यवसाय रोध भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

४.८) व्यवसाय रोध भत्ता अनुज्ञेय असलेले वैद्यकीय अधिकारी कार्यरत असलेल्या रूग्णालय/सेवा दवाखान्याच्या दर्शनिय भागात " येथे काम करणा-या वैद्यकीय अधिका-यांना व्यवसाय रोध भत्ता अनुज्ञेय असल्याने, खाजगी वैद्यकीय व्यवसाय करण्यास प्रतिबंध करण्यात आला आहे", असा फलक लावण्यात यावा.

४.९) वैद्यकीय अधिका-यांना व्यवसाय रोध भत्ता अनुज्ञेय असल्याची व त्यांना खाजगी व्यवसाय करण्यास प्रतिबंध असल्याची माहिती शासकीय संकेत स्थळावर प्रसिध्द करण्यात यावी.

४.१०) वैद्यकीय अधिका-याने आयकर विभागास सादर केलेल्या आयकर विषयक विवरणपत्राची (Income Tax Return) प्रत माहितीसाठी कार्यालय प्रमुखास सादर करावी.

४.११) ज्या वैद्यकीय अधिका-यांना उच्च शिक्षणासाठी प्रशिक्षणावर पाठविण्यात येईल अशा वैद्यकीय अधिका-यांना प्रशिक्षण कालावधी दरम्यान व्यवसायरोध भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

५. व्यवसोय रोध भत्त्याच्या अनुषंगाने असे सूचित करण्यात येते की, सदरचा व्यवसाय रोध भत्ता हा निवृत्ती वेतनासाठी आणि शासकीय निवासस्थानासाठी आकारण्यात येणा-या सेवा शुल्कासाठी हिशोबात धरण्यात यावा. या व्यतिरिक्त प्रवासभत्ता, दैनिक भत्ता, घरभाडे भत्ता, शहर भत्ता, वेतन निश्चिती इत्यादींसाठी तो हिशोबात धरण्यात येऊ नये.

६. व्यवसाय रोध भत्त्याच्या पोटी येणारा खर्च, संबंधित वैद्यकीय अधिका-यांच्या वेतन व भत्त्यापोटी येणारा खर्च ज्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येतो त्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

७. या आदेशान्वये अनुज्ञेय असलेला व्यवसायरोध भत्ता मूळ वेतनाशी निगडीत असल्याने शासनाच्या स्थायी आदेशानुसार, ज्या कालावधीकरीता मुळ वेतन अदा केले जात नाही, अशा कालावधीसाठी व्यवसायरोध भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

८. हा शासन निर्णय वित्त विभाग, अनौपचारीक संदर्भ क्रमांक ९८/सेवा-५, दिनांक ०९.०७.२०१५ अन्वये वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०७१७२८१४१५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Giridhar Patil

Digitally signed by Sanjay Giridhar Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Sanjay Giridhar Patil
Date: 2015.08.10 15:27:38 +05'30'

( सं. गि. पाटील )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त राज्य ,कामगार विमा योजना.मुंबई ,

२. महालेखापाल, महाराष्ट्र १/२,(लेखा व परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३. संचालक (वैद्यकीय/प्रशासन), राज्य कामगार विमा योजना, मुंबई.
४. सर्व वैद्यकीय प्रशासन अधिकारी, राज्य कामगार विमा योजना
५. सर्व वैद्यकीय अधिक्षक, राज्य कामगार विमा योजना रूग्णालये
६. संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई.
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०. वित्त विभाग, (सेवा-५, व्यय-१३), मंत्रालय, मुंबई
११. सह सचिव/कार्यासन अधिकारी (राकावि-२), सार्वजनिक आरोग्य विभाग
१२. स्वीय सहायक, प्रधान सचिव (सा.आ. व कु.क)
१३. निवड नस्ती - सेवा-१.